केंद्र शासनाच्या प्रारुप कायद्यातील तरतूदीच्या अनुषंगाने महाराष्ट्र विधानसभा विधेयक क्रमांक ६४ मध्ये सुधारणा करण्यासाठी शिफारस करण्याकरीता मंत्रिमंडळ उपसमिती पुर्नगठीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कृपमं-१११८/प्र.क्र.२०४/२१-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १७ मार्च, २०२०

वाचा : १) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.कृपमं-१११८/प्र.क्र.२०४/२१-स दि.१०.१२.२०१८
२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.कृपमं-१११८/प्र.क्र.२०४/२१-स दि.०१.०८.२०१९

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या कृषि व शेतकरी कल्याण विभागाने Agricultural Produce and Livestock Marketing (Promotion & Facilitation) Act, २०१७ (Model Act) प्रकाशीत केला आहे. केंद्र शासनाच्या या प्रारुप कायद्यातील तरतूदीच्या अनुषंगाने महाराष्ट्र कृषि उत्पन्न पणन (विकास व विनियमन) अधिनियम, १९६३ मध्ये सुधारणा करण्यासाठी सन २०१८ चा महाराष्ट्र अध्यादेश क्रमांक २४ दिनांक २५ ऑक्टोबर, २०१८ रोजी प्रख्यापित करण्यात आला होता. या अध्यादेशाचे रुपांतर अधिनियमात करण्याकरिता सन २०१८ च्या हिवाळी अधिवेशनात याबाबत सन २०१८ चे विधानसभा विधेयक क्रमांक ६४ मांडण्यात आले होते. परंतू सदर विधेयकामध्ये शासनास काही सुधारणा करावयाच्या होत्या त्यामुळे महाराष्ट्र विधानपरिषदेमध्ये विधेयक मागे घेण्यात आले. त्यानंतर या संदर्भात, दि.२९.११.२०१८ रोजी झालेल्या मंत्रीमंडळाच्या बैठकीत सदर विधेयक अंतिम करुन, सभागृहासमोर मांडण्यासाठी, राज्य विधानमंडळाच्या त्यावेळी चालू असलेल्या अधिवेशनात यासंदर्भातील विधेयक सादर करणे शक्य न झाल्यास, त्यासंदर्भातील अध्यादेश काढण्यासंदर्भात यथोचित निर्णय घेण्यासाठी, याकरिता असा प्रस्ताव मंत्रिमंडळाच्या मान्यतेसाठी फेरसादर करण्याची आवश्यकता असणार नाही असा निर्णय घेऊन दि.१०.१२.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये यावर शिफारस करण्यासाठी मंत्रीमंडळ उपसमिती गठीत करण्यात आली होती. तसेच दि.१६.०६.२०१९ रोजी राज्य मंत्रिमंडळात फेरबदल झाल्यामुळे दि.०१.०८.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये मंत्रीमंडळ उपसमिती पुर्नगठीत करण्यात आली होती. दरम्यान विधानसभेची दि.२१.१०.२०१९ रोजी निवडणूक होऊन दि.२८.११.२०१९ रोजी सार्वत्रिक नवीन मंत्रिमंडळ अस्तित्वात आले असल्यामुळे प्रस्तावित विधेयकातील तरतुदींबाबत अंतिम निर्णय घेण्याकरीता गठीत करण्यात आलेली मंत्रीमंडळ उपसमिती पुर्नगठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

महाराष्ट्र कृषि उत्पन्न पणन (विकास व विनियमन) अधिनियम, १९६३ मध्ये सुधारणा करण्याबाबतच्या सन २०१८ चे महाराष्ट्र विधानसभा विधेयक क्रमांक ६४ मध्ये सुधारणा करण्याकरीता शिफारस करण्यासाठी दि.०१.०८.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये गठीत केलेली मंत्रीमंडळ उपसमिती पुढीलप्रमाणे पुर्नगठीत करण्यात येत आहे.

१) मा.ना.श्री.शामराव ऊर्फ बाळासाहेब पांडुरंग पाटील , मंत्री (सहकार, पणन) - अध्यक्ष
२) मा. ना.श्री.विजय ऊर्फ बाळासाहेब भाऊसाहेब थोरात, मंत्री (महसूल) - सदस्य
३) मा.ना.डॉ. जितेंद्र सतिश आव्हाड, मंत्री (गृहनिर्माण) - सदस्य
४) मा.ना.श्री.दादाजी दगडू भुसे, मंत्री (कृषि, माजी सैनिक कल्याण) - सदस्य
५) मा.ना.श्री.शंभूराज शिवाजीराव देसाई, राज्यमंत्री (गृह (ग्रामीण),वित्त,नियोजन, राज्य उत्पादन शुल्क, कौशल्य विकास व उद्योजकता, पणन) - सदस्य
६) मा. मुख्य सचिव - सदस्य
७) प्रधान सचिव (पणन) - सदस्य सचिव

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००३१७१५१८३१३४०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jayant Baliram Bhoir

Digitally signed by Jayant Baliram Bhoir
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Cooperation, Marketing and Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=33a892413bd2c105002f2acc67792c5931afb42987d31b0deb6c0181d19c74aa, serialNumber=33432a8e2e81dcab0518d2a6ca4f4f1d3dba7ca3247657527f52bef2a2aa29b2, cn=Jayant Baliram Bhoir
Date: 2020.03.17 15:20:57 +05'30'

**( जयंत भोईर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.विरोधी पक्षनेता विधानसभा/विधानपरिषद, विधानभवन, मुंबई
४) मा. मंत्री (सहकार व पणन), मंत्रालय, मुंबई
५) मा. मंत्री (महसूल), मंत्रालय, मुंबई
६) मा. मंत्री (गृहनिर्माण), मंत्रालय, मुंबई
७) मा.मंत्री (कृषि व माजी सैनिक कल्याण), मंत्रालय, मुंबई
८) मा. राज्यमंत्री (गृह (ग्रामीण),वित्त,नियोजन,राज्य उत्पादन शुल्क, कौशल्य विकास व उद्योजकता, पणन) मंत्रालय, मुंबई

९) सर्व मा.मंत्री व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

१०) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई

११) प्रधान सचिव (पणन) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई

१२) निवडनस्ती (२१-स).